केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत (PMJVK) यवतमाळ जिल्हयातील नगर परिषद, पुसद येथे अभ्यासिका केंद्र बांधकामासाठी अनुदान वितरीत करण्याबाबत (केंद्र हिस्सा+राज्य हिस्सा) सन २०१९-२०.

# महाराष्ट्र शासन

## अल्पसंख्याक विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः अविवि-२०१९ /प्र.क्र.४३/का.७,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
दिनांक: - ३१ जुलै, २०२४

**संदर्भ:** - १. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.१३/६१/२०१९-MsDP-MOMA, दि २६/०९/२०१९.
२. शासन ज्ञापन, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अ.वि.वि-२०१९/प्र.क्र.४३/ का-७,दि.१० /०१/२०२०.
३. शासन निर्णय क्र. अ.वि.वि-२०१९/प्र.क्र.४३/का-७, दि.१० /०१/२०२०.
४. मा.जिल्हाधिकारी यवतमाळ यांचे पत्र क्र. जा.क्र./नपा/का-०९/कावि/१०५३/२०२३.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत (PMJVK) राज्यातील पुसद,जि.यवतमाळ येथे अभ्यासिका केंद्र बांधकामाचा रु.११८.०० लाख इतक्या रकमेचा प्रस्ताव मा.मुख्य सचिव, यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय संनियंत्रण समितीच्या सहमतीने केंद्र शासनास पाठविण्यात आला होता.

२. केंद्र शासनाच्या प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत (PMJVK) गठित शक्तिप्रदान समितीने दि.१३/०९/२०१९ रोजी झालेल्या १८ व्या बैठकीत यवतमाळ जिल्हयातील पुसद येथे अभ्यासिका केंद्र बांधकामासाठी एकूण रु.१०६.०० लाख इतक्या रकमेच्या प्रस्तावास मान्यता दिली असल्याचे संदर्भ क्र. (१) अन्वये कळविण्यात आले आहे.

संदर्भ क्र.(२) नुसार यवतमाळ जिल्हयातील पुसद येथे अभ्यासिका केंद्र बांधकामासाठी एकूण रु.१०६.०० लाख इतक्या रकमेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता दिली असुन संदर्भ क्र. (३) अन्वये सदर कामाकरीता केंद्र हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील रु.३१.८० लाख व राज्य हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील रु.२१.२० लाख असा एकूण रु. ५३.०० लाख इतका निधी वितरीत केला आहे.

३. प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत (PMJVK) अंतर्गत यवतमाळ जिल्हयातील पुसद येथे अभ्यासिका केंद्र बांधकामासाठी केंद्र शासनाकडून मंजूर/वितरित करण्यात आलेली केंद्र हिश्श्यातील उर्वरीत रु.३१.८० लाख तसेच राज्य हिश्यातील उर्वरीत रु.२१.२० लाख असा एकूण रु.५३.०० लाख इतका निधी जिल्हाधिकारी,यवतमाळ यांना मंजूर करुन वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१. प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम (PMJVK) अंतर्गत पुसद, जि. यवतमाळ येथे अभ्यासिका केंद्र बांधकामासाठी मंजूर/वितरित करण्यात आलेला केंद्र हिश्श्यातील दुस-या टप्प्यातील रु.३१.८० लाख तसेच राज्य हिश्यातील दुस-या टप्प्यातील रु.२१.२० लाख असा एकूण रु.५३.०० लाख इतका निधी जिल्हाधिकारी, यवतमाळ यांना खालील प्रमाणे वितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे :-

(रु. लाखात)

| Sr. No. | Name of project | No. of units | Unit Cost/ Sharing Pattern | Central share | State share | GOI 1st install. Released | GOM 1st install. Released | GOI 2st install. to be Released | GOM 2st Install. to be Released |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 | 10 |
| 1 | Construction Library Centre near Hazarat Umar faruque High School in ward No 9, Muncipal council Pusad | 01 | 106.00 (60:40) | 63.60 | 42.40 | 31.80 | 21.20 | 31.80 | 21.20 |

केंद्र व राज्य शासनाकडून केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधीचे परिणामकारक व्यवस्थापन करण्याच्या तसेच निधी विनियोगामध्ये अधिक परिणामकारकता आणण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाच्या सार्वजनिक वित्तीय प्रणाली (PFMS) व्दारे निधी वितरीत करण्यास सुरूवात करण्यात आली आहे. त्यानुषंगाने,

- प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम ही केंद्र पुरस्कृत योजना असून PFMS प्रणालीच्या सुधारीत कार्यपध्दतीनुसार प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम या योजनकरीता Single Nodal Agency म्हणून अवर सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय यांची नियुक्ती करण्यात आली आहे.
- तसेच सदर योजनेचे SNA खाते स्टेट बँक ऑफ इंडिया, मंत्रालय शाखा येथे उघडण्यात आले आहे. सदर योजना PFMS प्रणालीवर Map करण्यात आली आहे.

२. सन २०२२-२३ या वर्षात प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत अल्पसंख्याक बहुल क्षेत्रातील प्रकल्प राबविण्यासाठी केंद्र शासनाकडून विविध कामांना वितरीत केलेला व त्यासमरूप वितरीत करावयाचा राज्य

हिश्श्यातील निधी योजनेच्या स्टेट बँक ऑफ इंडिया, मंत्रालय शाखा येथे उघडण्यात आलेल्या SNA खाते क्र. 40533345678 व IFSC CODE - SBIN0061524 खात्यावर जमा करण्यात आला आहे.

३. जमा करण्यात आलेल्या योजनेच्या SNA खात्यामधून उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र. (९) व (१०) प्रमाणे मंजूर करण्यात आलेला केंद्र व राज्य हिश्श्यातील दुस-या टप्प्यातील एकूण **रू.५३.०० लाख** इतका निधी PFMS प्रणालीव्दारे पुसद नगर परीषद, जि.यवतमाळ येथे अल्पसंख्याकांसाठी अभ्यासिका केंद्र बांधकामाकरीता **जिल्हाधिकारी, यवतमाळ** यांना वितरित करण्यात येत आहे. याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. **जिल्हाधिकारी, यवतमाळ** यांनी **PFMS प्रणालीव्दारेच** सदर रक्कम विकासकामांच्या अंमलबजावणीशी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेस रितसर वितरित करावी.

४. केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या सूचनांनुसार प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमाअंतर्गत (PMJVK) ज्या प्रयोजनाकरिता निधी मंजूर करुन वितरित केला आहे, त्याच प्रयोजनार्थ सदर निधी खर्च करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत अन्य प्रयोजनाकरिता सदर निधी खर्च केल्यास सर्व संबंधित अधिकाऱ्यांवर विनाविलंब कारवाई करण्यात येईल.

५. प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत (PMJVK) मान्यताप्राप्त विकासकामांच्या अमंलबजावणीकरिता संबंधित अमंलबजावणी यंत्रणेने आवश्यक त्या बाबींची त्वरेने पूर्तता करून घ्यावी. शासन निकषानुसार तसेच विकासकामांच्या अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकरणाने दिलेल्या तांत्रिक मंजुरीनुसार निविदा प्रक्रिया करावी. सक्षम प्राधिका-याची तांत्रिक मंजुरी तसेच प्रत्यक्ष निधी प्राप्त झाल्याशिवाय कामास सुरूवात करू नये. विकासकामांशी संबंधित सक्षम प्राधिकरणाकडून निर्गमित करण्यात येणाऱ्या तांत्रिक मंजुरीच्या / कामाच्या आदेशानुसार, विकासकामांची अमंलबजावणी विहीत कालावधीत पूर्ण करण्याबाबत जिल्हाधिकारी, यवतमाळ यांनी दक्षता घ्यावी.

६. सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C च्या मार्गदर्शक तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार कोणताही शासन निर्णय / अटी व शर्तीचा भंग होणार नाही, याची दक्षता जिल्हाधिकारी, यवतमाळ यांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी जिल्हाधिकारी, यवतमाळ यांनी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / कार्यालयीन आदेश / वित्तीय नियमावली / सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली / भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचे निरिक्षण अहवाल / वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा.

७. अमंलबजावणी यंत्रणा यांनी विषयांकीत विकासकामांच्या बांधकामासाठी केंद्र व राज्य शासनाकडून प्राप्त झालेल्या निधीच्या विनियोगाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे तसेच त्रैमासिक अहवाल (QPR), अद्ययावत छायाचित्रांसह जिल्हाधिकारी यांच्यामार्फत शासनास सादर करावीत. तसेच विभागाच्या Construction tracker प्रणालीवर देखील विषयांकीत विकासकामांच्या बांधकामाची माहिती वेळोवेळी Upload करावी.

८. जिल्हाधिकारी, यवतमाळ यांनी मान्यताप्राप्त विकासकामांच्या अमंलबजावणीसाठी दुसऱ्या टप्प्यातील निधीची मागणी करताना पहिल्या टप्प्यात प्राप्त सर्व निधीच्या वापराबाबतची विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्रे (UC) तसेच त्रैमासिक अहवाल (QPR), अद्ययावत छायाचित्रांसह प्रस्तावासोबत शासनास सादर करावी. तसेच निधीचे उपयोगीता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालयास सादर करण्याची आणि महालेखापालांच्या लेख्यांशी खर्चाचा ताळमेळ घालण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, यवतमाळ यांची राहील.

९. “सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल,२०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२ एप्रिल,२०२३ व २५ जुलै, २०२४ मधील अटींची पुर्तता असल्याने प्राप्त मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.”

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२४०८०२१४३८४६०५१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MILIND PADMANABH SHENOY

Digitally signed by MILIND PADMANABH SHENOY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=a45302e7be40ef2fa6a43ca3b215a6542fe92b8f994959680f52a7ae3a293948, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F493AF30AF7B26C53298AE259841E86E196988EEE98D450625570240B6F3B989, cn=MILIND PADMANABH SHENOY
Date: 2024.08.02 14:53:47 +05'30'

**( मिलींद शेणॉय )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अ.मु.सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. विभागीय आयुक्त,अमरावती.
४. जिल्हाधिकारी, यवतमाळ.
६. मुख्याधिकारी, नगर परिषद, पुसद.
७. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
८. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा ) मुंबई/नागपूर.
९. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अमरावती.
१०.अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अमरावती
११.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, यवतमाळ.
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ.
१३.वित्त विभाग (अर्थसंकल्प -४/ व्यय -४) मंत्रालय, मुंबई.
१४.नियोजन विभाग (कार्या.१४७५)
१५.निवड नस्ती, (का.७)